अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक-गट अ (राजपत्रित) संवर्गातील अधिका-यांच्या नियतकालिक बदल्यांबाबत...

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन आदेश क्रमांकः बदली १११७/प्र.क्र. ५५/का.१४२७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१ मे, २०१७

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४ (१) ते ४ (४) मधील तरतूदीनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-अ (राजपत्रित) (रुपये १५६००-३९१०० + ग्रेड वेतन रुपये ५४००) या संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिका-यांची सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव | सध्याचे पदनाम व कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.आर.व्ही.वसावे | उपसंचालक, आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई | उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई या रिक्त पदी. |
| २ | श्री.कृ.व.फिरके | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, नागपूर | महाराष्ट्र शासकीय कर्मचारी बदली अधिनियम, २००५ मधील कलम ५ (ख) नुसार सदर पदावर एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ३ | श्री.र.वि.जगताप | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जालना | महाराष्ट्र शासकीय कर्मचारी बदली अधिनियम, २००५ मधील कलम ५ (ख) नुसार सदर पदावर एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ४ | श्री.सं.वि.मुळे | उपसंचालक (मूल्यमापन), मुख्य कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई | महाराष्ट्र शासकीय कर्मचारी बदली अधिनियम, २००५ मधील कलम ५ (ख) नुसार सदर पदावर एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ५ | श्रीमती नि.रु.पाटील | उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नागपूर | महाराष्ट्र शासकीय कर्मचारी बदली अधिनियम, २००५ मधील कलम ५ (ख) नुसार सदर पदावर एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव | सध्याचे पदनाम व कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ६ | श्रीमती शि.अ.पांडे | उपसंचालक, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे | महाराष्ट्र शासकीय कर्मचारी बदली अधिनियम, २००५ मधील कलम ५ (ख) नुसार सदर पदावर एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ७ | श्रीमती तृ.प्र.बापट | उपसंचालक (अर्थ), मुख्य कार्यालय, मुंबई | महाराष्ट्र शासकीय कर्मचारी बदली अधिनियम, २००५ मधील कलम ५ (ख) नुसार सदर पदावर एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ८ | श्री.मि.भा.नारिंगे | वरिष्ठ संशोधन अधिकारी, अपर आयुक्त आदिवासी विकास यांचे कार्यालय, नागपूर | महाराष्ट्र शासकीय कर्मचारी बदली अधिनियम, २००५ मधील कलम ५ (ख) नुसार सदर पदावर एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ९ | श्रीमती मं.पं.देशपांडे | वरिष्ठ संशोधन अधिकारी, मुख्य कार्यालय, मुंबई | महाराष्ट्र शासकीय कर्मचारी बदली अधिनियम, २००५ मधील कलम ५ (ख) नुसार सदर पदावर एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |

२. बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास तो अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईसाठी पात्र ठरेल.

३. संबंधित कार्यालय प्रमुखांनी संबंधित अधिकाऱ्यांच्या पदाचा पदभार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून या अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच बदली केलेल्या पदावर वरील अधिकारी त्यांना देय / अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधीत रुजू न झाल्यास संबंधित कार्यालयाने त्यांचे वेतन काढू नये. कोणत्याही परिस्थितीत प्रतिक्षाधीन कालावधी नियमित करण्यात येणार नाही. यासंदर्भात वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: सेनिवे-१००१/१३०/सेवा-४, दिनांक ०२.०६.२००३ मधील परिशिष्ट-१, नियम क्र.९ (१४) (एफ) शेरा क्र.२ नुसार सक्तीचा प्रतिक्षा कालावधी निर्माण होण्यास जबाबदार ठरणा-या संबंधित अधिका-यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

४. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्यावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्यावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिका-यांच्या त्या महिन्याच्या वेतन देयकासोबत कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु नये. तसेच, अद्ययावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयप्रमुखांची राहील.

५. काही अधिकारी बदली आदेशाचे पालन करीत नाहीत त्यामुळे प्रशासकीय कामकाजात अडथळा उत्पन्न होतो असे निदर्शनास आले आहे. यास्तव वरील अधिकाऱ्यांनी त्यांना देय / अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधीतच बदलीच्या ठिकाणी रुजू व्हावे. याबाबत दिरंगाई झाल्याचे व शासन आदेशाचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधिताविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

६. बदली करण्यात आलेल्या अधिका-यांनी त्यांना कार्यमुक्त केल्याबाबतच्या आणि त्यांनी कार्यभार स्विकारल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

७. सदरहु शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५३११०३५५७७८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2017.06.01 15:59:25 +05'30'

**( प्रियांका रं.छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपुर,
२) मा.मुख्यमंत्री/मा.मंत्री (नियोजन)/मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त (सर्व),
४) आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई
५) आयुक्त, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे
६) अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कार्यालय, नागपूर
७) जिल्हाधिकारी, नागपूर/ जालना
८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
९) उप सचिव (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) सह संचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय (सर्व)
११) प्रधान सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१२) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय (सर्व)
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर/जालना
१६) सर्व संबंधित अधिकारी (अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत)
१७) निवड नस्ती.